महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१

परिवीक्षाधीन कर्मचा-याची वेतनवाढ नियमित करणे.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक: वेतन-१०९०/प्र.क्र. ४८/सेवा-३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३० एप्रिल, १९९१.

प रि प त्र क

परिवीक्षाधीन म्हणून एखाद्या पदावर थेट नियुक्ती केलेल्या शासकीय कर्मचा-याची वेतन वाढ [वेतन वाढी] परिवीक्षेच्या कालावधीत महाराष्ट्र नागरी सेवा [वेतन] नियम, १९८१ च्या नियम, ३९ खालील अपवाद १ प्रमाणे नियमित केली जाते आणि अशा परिवीक्षाधीन कर्मचा-याला वेतनवाढीला नियम ३९[१] मधील परंतुक लागू नसल्यामुळे ही वेतनवाढ ज्या दिनांकाला अनुज्ञेय असते त्याच दिनांकास दिली जाते. शासनाच्या असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, उक्त अपवाद १ मधील खंड[ए] च्या उपखंड [दोन] अनुसार एखाद्या कर्मचा-याच्या परिवीक्षेचा कालावधी विहित अवधीत तो विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे किंवा परिवीक्षेच्या कालावधीमध्ये त्याने रजा घेतल्यामुळे, वाढलेला असेल आणि अशा कर्मचा-याने परिवीक्षेचा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर दीर्घ मुदतीच्या तत्वावर त्याची त्या पदावर नियुक्ती झाली असेल तेव्हा, जर तो परिवीक्षाधीन नसता तर, त्याला जे वेतन मिळाले असते असे वेतन व आनुषंगिक थकबाकी देण्यात येते. म्हणून असा परिवीक्षाधीन कर्मचारी नियम ३९[१] च्या परंतुकानुसार त्याची वेतनवाढ महिन्याच्या पहिल्या तारखेपासून घेऊ शकतो. तथापि, ज्या परिवीक्षाधीन कर्मचा-याने त्याचा परिवीक्षाधीन कालावधी रजा न घेता पूर्ण केलेला आहे आणि विभागीय परीक्षा वेळेवर उत्तीर्ण केलेली आहे त्याला महिन्याच्या १ तारखेपासून वेतनवाढ काढण्यास अनुमती दिली जात नाही, कारण उक्त अपवाद १ मधील खंड [ए] च्या उपखंड[एक] मध्ये "जर तो परिवीक्षाधीन नसता तर त्याला जे वेतन मिळाले असते असे वेतन व आनुषंगिक थकबाकी देण्यात यावी." अशी तरतूद नाही.

२. या संबंधात असे स्पष्ट करण्यात येते की, ज्या परिवीक्षाधीन कर्मचा-याची वेतनवाढ [वेतनवाढी] प्रकरण परत्वे, अपवाद १ च्या खंड[ए] मधील उपखंड[एक] किंवा [दोन] प्रमाणे नियमित केल्या जातात, त्या परिवीक्षाधीन कर्मचा-याला त्याने त्याचा परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर अनुज्ञेय वेतनवाढ ज्या महिन्यात देय झाली आहे त्या महिन्याच्या १ तारखेपासून देण्यात यावी आणि आनुषंगिक थकबाकी, काही असेल तर, देण्यात यावी.

३. अशा प्रकारच्या प्रकरणांमध्ये आधीच निर्णय घेतला गेला असेल तर अशा प्रकरणाचा पुनर्विचार करण्यात येऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सौ. मं. मं. कोरगांवकर,
शासनाच्या उप सचिव, वित्त विभाग.

[कृ.मा.प.]

शा.म.मु. रोटा/वि. वि. /एस-३७[१५,००० ] १०-५-९१]

प्रति,

महालेखापाल-१, [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२, [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१, [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२, [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ शाखा], मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे-रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, [व्यय विभाग], खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, सेवा-३.

---

* पत्राव्दारे.